**गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१४/प्र.क्र. ९६/पापु-०१

७ वा मजला, गोळुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २४ एप्रिल, २०१५

<u>वाचा :</u>

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** एसआरव्ही-२०१४/प्र.क्र. २६/१२, दिनांक ३१ जानेवारी, २०१४.
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** एसआरव्ही-२०१४/प्र.क्र. २६/१२, दिनांक २० मे, २०१४.
३) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** एसआरव्ही २०१४/प्र.क्र. २६/१२, दिनांक १९ जानेवारी, २०१५.
४) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** एसआरव्ही २०१४/मु. स.-३४/प्र.क्र. ३७९/१२, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१५.

<u>प्रस्तावना :</u>

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्रमांक ८२/२०११ मध्ये दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३ रोजी दिलेल्या निर्देशास अनुसरुन शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळे स्थापन करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या. तथापि, संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयास पुढील आदेश होईपर्यंत स्थगिती देण्यात आली होती. आता संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयास दिलेली स्थगिती उठविण्यात आली असून, प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब (राजपत्रित) मधील संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याचे अनिवार्य केले आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या निर्देशानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा कार्यालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे.

**नागरी सेवा मंडळ (१)**

| अ.क्र. | पदनाम | नागरी सेवा मंडळातील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे | सदस्य |
| ३ | सह सचिव / उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

तसेच, पाणी व पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे.

**नागरी सेवा मंडळ (१)**

| अ.क्र. | पदनाम | नागरी सेवा मंडळातील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| ३ | सह सचिव / उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

१. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील तसेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील

अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदली याबाबत शिफारशी करण्यासाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळ (१) समोर ठेवण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. बदल्यांबाबत शिफारशीसाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर ठेवताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करुन वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्वभूमी/वस्तुस्थिती नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणणे आवश्यक राहील.

३. गट-अ व गट-ब (राजपत्रित) पदांवर पदोन्नतीने/सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग वाटप, सामान्य प्रशासन विभाग (सेवा) उप विभागाने अंतिम केल्यानंतर त्या यादीतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव प्रशासकीय विभागाने संबंधित नागरी सेवा मंडळासमोर शिफारशीसाठी ठेवावा.

४. गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील जिल्हास्तरावर बदलीपात्र कर्मचाऱ्यांच्या बाबतीत जिल्ह्याबाहेर तसेच महसूली विभाग/परिमंडळ/संभाग/प्रादेशिक स्तरावर बदलीपात्र कर्मचाऱ्यांच्या बाबतील अन्य महसूली विभाग/परिमंडळ/संभाग/प्रादेशिक कार्यालयांमध्ये बदलीसाठीचे शिफारशीचे प्रस्ताव नागरी सेवा मंडळ (१) समोर ठेवणे आवश्यक राहील.

५. पदस्थापनेसाठी प्रस्तावावर नागरी सेवा मंडळाकडून शिफारश झाल्यावर, शिफारशीनुसार प्रस्ताव प्रशासकीय विभागाने सक्षम प्राधिकाऱ्यास आणि प्रादेशिक विभागप्रमुखांनी प्रशासकीय विभाग प्रमुख यांना मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय सक्षम प्राधिकाऱ्याकडून घेण्यात येईल.

६. बदलीसाठीच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर, प्रशासकीय विभागाने/विभाग प्रमुखांनी प्रस्ताव महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियमातील तरतूदीनुसार उचित सक्षम प्राधिकाऱ्यास मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय संबंधित प्राधिकाऱ्याकडून घेण्यात येईल.

७. बदल्यांसंबंधीच्या प्रस्तावावर, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१७२२१६६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shantaram S Kudale

Digitally signed by Shantaram S Kudale
DN: CN = Shantaram S Kudale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.24 18:45:03 +05'30'

**(शां. सि. कुदळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व), मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व नियंत्रण अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सह सचिव (कार्या.१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सह सचिव/उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
११. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईंट, मुंबई
१२. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१३. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व)
१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

१८. महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर.

१९. अवर सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. कक्ष अधिकारी (कार्यासन पापु-१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. कक्ष अधिकारी (कार्यासन पापु-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. कार्यासन अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख.

२४. संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२५. निवडनस्ती (कार्यासन पापु-०१)